**महाराष्ट्र शासनाने दिनांक ०१ मार्च,२०२३ रोजी निर्गमित केलेल्या अधिसूचनेच्या प्रभावी अंमलबजावणीसाठी कार्यप्रणाली (Modality) बाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : PIL २०२१/प्र.क्र.१४/तां.क.१**

१५ वा मजला, नवीन प्रशासकीय भवन,
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ३२.
दिनांक : २५ ऑगस्ट,२०२३.

वाचा-

१) पर्यावरण व वातावरणीय बदल विभागाने निर्गमित केलेली अधिसूचना दिनांक ०१ मार्च,२०२३.
२) पर्यावरण संरक्षण कायदा १९८६च्या कलम अन्वये पर्यावरण व वातावरणीय बदल विभागाने निर्गमित केलेले निर्देश क्रमांक CRT-2015/CR-37/T.C.1 दिनांक २९ डिसेंबर,२०२२.
३) मा. उच्च न्यायालय, मुंबई (नागपूर खंडपीठ) येथे दाखल Suo Motu जनहीत याचिका क्र.०१/२०२१.

**प्रस्तावना** :- मा.राष्ट्रीय हरित न्यायाधिकरणाकडे दाखल मूळ अर्ज क्र.३८४/२०१६ अंतर्गत खालिद अश्रफ विरुध्द भारतीय संघराज्य आणि इतर यामध्ये दिलेल्या मा.राष्ट्रीय हरित न्यायाधिकरणाच्या आदेशाच्या अनुपालनार्थ मनुष्य जातीवर व पक्षांवर होणारा प्रतिकूल परिणाम टाळण्याच्या दृष्टीने अशा प्लास्टिकच्या किंवा सिंथेटिक कृत्रिम धाग्याचा वापर करण्याचा प्रतिबंध घालणे आवश्यक आहे.

त्याअनुषंगाने अशा (सिंथेटिक) कृत्रिम धाग्याच्या वापराचा प्रतिकूल परिणाम सर्वसाधारण सुरक्षेवर आणि जैवविविधतेवर होत असल्याचे निदर्शनास आणून देण्यासाठी आणि अशा धाग्याऐवजी पर्यायी पर्यावरणपूरक धाग्यांचा वापरास प्रोत्साहन देण्यासाठी पर्यावरण (संरक्षण) अधिनियम,१९८६ च्या नियम ४ अन्वये प्रदान केलेल्या अधिकारांचा वापर करुन महाराष्ट्र शासनाने दिनांक ०१ मार्च,२०२३ रोजी अधिसूचना निर्गमित केलेली आहे. सदर अधिसूचनेच्या प्रभावी अंमलबजावणीसाठी कार्यप्रणाली (Modality) तयार करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**:- पर्यावरण व वातावरणीय बदल विभागाने दिनांक ०१ मार्च,२०२३ रोजी निर्गमित केलेल्या अधिसूचनेची प्रभावी अंमलबजावणी करण्यासाठी खालील कार्यप्रणाली (Modality) तयार करण्यात आली आहे.

| क्रमांक | कार्यप्रणाली | जबाबदार विभाग/संस्था |
|---|---|---|
| १. | शाळा कॉलेजांमध्ये जनजागृती करणे | शालेय शिक्षण व उच्च व तंत्र शिक्षण विभाग, महाराष्ट्र शासन |
| २. | सामान्य नागरिकांच्या तक्रारींचे संनियंत्रण करण्याकरिता व दोषींवर कडक कार्यवाही करणेकरिता स्वतंत्र कक्ष (टोल फ्री नंबर सहित) स्थापित करणे | दिनांक ०१ मार्च,२०२३ रोजीच्या अधिसूचनेनुसार प्राधिकृत करण्यात आलेले सर्व अधिकारी, स्थानिक स्वराज्य संस्था/पोलीस विभाग/जिल्हा परिषद व वन विभाग. |
| ३. | पर्यावरण व वातावरणीय बदल विभागाने निर्गमित केलेल्या निर्देशांच्या अनुषंगाने राज्यामध्ये सिंथेटिक/नॉयलॉन मांजाची विक्री, उत्पादन, साठवण पुरवठा आणि वापर यांवर निर्बंध सुनिश्चित करण्यासाठी महिन्यातून एकदा आढावा बैठक घेणे. | दिनांक ०१ मार्च,२०२३ रोजीच्या अधिसूचनेनुसार प्राधिकृत करण्यात आलेले सर्व अधिकारी,स्थानिक स्वराज्य संस्था/पोलीस विभाग/जिल्हा परिषद व वन विभाग. |
| ४. | सिंगल युज प्लॅस्टिक नोटिफीकेशनच्या अंमलबजावणीसाठी दिनांक २६ एप्रिल,२०२२ रोजी गठीत केलेल्या जिल्हास्तरिय टास्क फोर्स समितीने दिनांक ०१ मार्च,२०२३ रोजी निर्गमित केलेल्या अधिसूचनेच्या अंमलबजावणीबाबत सुध्दा महिन्यातून एकदा आढावा बैठक घेणे. | सर्व जिल्हाधिकारी. |
| ५. | राज्याच्या सीमा चेक पोस्ट वर संनियंत्रण करणे | परिवहन विभाग |
| ६. | सिंथेटिक/नॉयलॉन मांजाची विक्री, उत्पादन, साठवण पुरवठा आणि वापर टाळण्यासाठी प्रभावी उपाययोजना तयार करणे | सर्व जिल्हाधिकारी, स्थानिक स्वराज्य संस्था,पोलीस विभाग, विभागीय परिवहन अधिकारी, आरोग्य विभाग, जिल्हा परिषद व वन विभाग |
| ७. | सिंथेटिक/नॉयलॉन मांजाचे उत्पादन करणारे कारखाने शोधून काढणे | सर्व प्रादेशिक अधिकारी/उप-प्रादेशिक अधिकारी, महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळ. |

उपरोक्त कार्यप्रणालीची प्रभावी अंमलबजावणी सर्व संबंधित संस्था/भागधारक करतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या अधिकृत संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२३०८२५१५२६३७१५०४ असा आहे. हा शासन निर्णय डिलीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्रचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MADANE VISHAL VISHWAS

Digitally signed by MADANE VISHAL VISHWAS
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=bb0ed28a897fc87f69fe8807b3d9428966ce3233edb83a20c38834c19f2e3793, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=CB16DB1CC002E115B709A8CA348A6483883493AAF53B7BE25836CDA1B57FF2DC, cn=MADANE VISHAL VISHWAS
Date: 2023.08.25 15:29:40 +05'30'

**( विशाल मदने )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव मंत्रालय, मुंबई-३२.
२. मा.उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
३. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-३२.
४. शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय मुंबई-३२.
५. सर्व पोलीस अधिक्षक, महाराष्ट्र राज्य
६. सदस्य सचिव, महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळ, सायन मुंबई-२२
७. सर्व विभागीय आयुक्त
८. सर्व जिल्हाधिकारी, महाराष्ट्र राज्य
९. सर्व आयुक्त महानगरपालिका कार्यालय, महाराष्ट्र राज्य
१०. सर्व मुख्याधिकारी, नगर परिषद महाराष्ट्र राज्य
११. सर्व मा.मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
१२. निवड नस्ती.